**डॉ.पी.व्ही.जब्दे, प्राचार्य, मुक्तानंद महाविद्यालय, गंगापूर, जि.औरंगाबाद यांची, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील कुलसचिव या पदावर एका वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण २०१६/प्र.क्र.५८२/१६/वि.शि.-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १४ मार्च, २०१७

संदर्भ :- १) शासनाचे समक्रमांकाचे दि.०७ फेब्रुवारी, २०१७ चे पत्र.
२) कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ औरंगाबाद यांचे क्र.आस्था/ आरओ/२०१७/६८६१, दि.०९ फेब्रुवारी, २०१७ चे पत्र.

प्रस्तावना :-

डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या विद्यापीठातील कुलसचिव हे पद दि.०६.०१.२०१५ पासून रिक्त झालेले आहे. विद्यापीठाच्या कुलसचिव पदावर महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम १७(१) अनुसार शासनास असलेल्या अधिकारांतर्गत करावयाच्या नियुक्तीबाबतचा सविस्तर प्रस्ताव शासनास सादर करण्यास विद्यापीठास संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये कळविण्यात आले होते. त्यास अनुसरुन विद्यापीठाने डॉ.पी.व्ही.जब्दे, प्राचार्य, मुक्तानंद महाविद्यालय, गंगापूर हे कुलसचिव पदासाठीची शैक्षणिक अर्हता व अनुभव धारण करीत असल्याने विद्यापीठावर त्यांच्या कुलसचिव पदावर केलेल्या तात्पुरत्या नियुक्तीस मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव आनुषंगिक कागदपत्रांसह संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०९.०२.२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेला आहे.

आता, दि.०१ मार्च, २०१७ या दिनांकापासून महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठे अधिनियम, २०१६ अंमलात आणण्यात आलेला आहे.

वरील बाबी विचारात घेऊन महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठे अधिनियम, २०१६ अनुसार शासनास असलेल्या अधिकारात डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या विद्यापीठाच्या कुलसचिव पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठे अधिनियम, २०१६ मधील कलम ८ (५) मधील तरतुदीनुसार शासन या आदेशान्वये, डॉ.पी.व्ही.जब्दे, प्राचार्य, मुक्तानंद महाविद्यालय, गंगापूर, जि.औरंगाबाद यांची कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या पदावर सहा महिन्यांच्या कालावधीसाठी अथवा कुलगुरुंकडून नवीन कुलसचिवांची यथोचितरित्या नियुक्ती

होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तेवढया कालावधीसाठी, प्रतिनियुक्तीने नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून खालील अटींच्या अधीन राहून करीत आहे :-

१) डॉ.पी.व्ही.जब्दे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील, त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल. त्यानंतर सहा महिन्यांनी अथवा कुलगुरुंकडून नवीन कुलसचिवांची यथोचितरित्या नियुक्ती होईपर्यंत अथवा, यापैकी जे आधी घडेल तेवढया कालावधीनंतर प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करतील , त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

२) जर त्यांची सेवा त्यांच्या मूळ कार्यालयास आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवतील.

३) जर त्यांची सेवा विद्यापीठाला आवश्यक वाटली नाही तर, त्यांना मूळ कार्यालयाकडे परत पाठविण्याची मुभा विद्यापीठाला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी विद्यापीठाने शासनाला/सक्षम प्राधिका-याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे, आणि

४) त्यांनी मूळ कार्यालयाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिका-याला दिल्यानंतर त्यांना मूळ कार्यालयाकडे परत जाण्याची मुभा राहील.

प्रतिनियुक्तीच्या कालावधीत डॉ.पी.व्ही.जब्दे यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. त्यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती दोन्ही आस्थापनांनी (संबंधित संस्था व विद्यापीठ) आपापसात सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१६४३५४५३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vijay Eknath Sable
Date: 2017.03.14 18:06:18 +05'30'

**( विजय साबळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. डॉ.पी.व्ही.जब्दे, प्राचार्य, मुक्तानंद महाविद्यालय, गंगापूर, जि.औरंगाबाद

**प्रत,**

१. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
३. कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
४. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
५. कुलसचिव, नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
६. प्रशासकीय अधिकारी, मराठवाडा शिक्षण प्रसारक मंडळ, देवगिरी कॉलेज कॅम्पस, स्टेशन रोड, औरंगाबाद - ४३१००५.